**महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील अधिकारी/कर्मचारी यांना साप्ताहिक सुट्टीच्या मोबदल्यात देण्यात येणा-या दैनिक भत्याच्या दरात वाढ करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : जेएलई १०१०/५३६/प्र.क्र. १८८/ पुर्नबांधणी क्र. १२०/ तुरुंग १ ( भाग-१)
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय-४०० ०३२
दिनांक : ०१ डिसेंबर, २०१६

वाचा :-

१) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ३ मार्च २०१०.

२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.जेएलई-१०१०/ ५३६/ प्र.क्र.१८८/ पु.बां.क्र.१२०/तुरुंग-१, दिनांक २६ एप्रिल २०१६.

३) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचे पत्र क्र.अपोमसंवकामनि/पुणे/क-५/ पोप्रभत्ते/ १०४१७/२०१६, दिनांक ७/११/२०१६.

प्रस्तावना :

महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभाग पोलीस विभागाप्रमाणेच गुन्हेगारी प्रशासनाच्या यंत्रणेचा एक भाग असून त्यांचा अत्यावश्यक सेवेत समावेश होतो. त्यामुळे या दोन्ही विभागातील अधिकारी/कर्मचा-यांना देण्यात येणा-या सुविधेमध्ये समानता असणे आवश्यक आहे. सबब, पोलीस विभागातील अधिकारी/ कर्मचा-यांना लागू असलेल्या सुविधा/लाभदायी योजनांचा आढावा घेऊन त्या आवश्यकतेनुसार कारागृह व सुधारसेवेत कार्यरत गणवेषधारी अधिकारी/कर्मचा-यांना सुध्दा लागू करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र पोलीस विभागातील अधिकारी/कर्मचा-यांना लागू असलेल्या इतर सुविधा/ लाभदायी योजना कारागृह व सुधारसेवेतील गणवेषधारी अधिकारी/कर्मचा-यांना आवश्यकतेनुसार लागू करणेसाठी निर्णय घेणेकरीता अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्र-०२ अन्वये समिती स्थापन करण्यात आलेली आहे व उपरोक्त समितीस पोलीस विभागाला लागू असलेल्या सर्व सुविधा/लाभदायी योजनांचा अभ्यास करुन त्या कारागृह व सुधारसेवेतील अधिकारी/कर्मचा-यांना लागू करण्यासाठी आवश्यकतेनुसार बदल करुन लागू करण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

त्या अनुषंगाने अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १९/११/२०१६ रोजी समितीची बैठक आयोजित करण्यात आलेली होती. सदर बैठकीमध्ये महाराष्ट्र पोलीस दलातील अधिकारी यांच्या प्रमाणेच महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवेतील कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या संवर्गातील अधिकारी/कर्मचा-यांना देय असलेले एका दिवसाचे वेतन (मूळ वेतन, अधिक भत्ते) दैनिक भत्ता म्हणून देण्यास समितीने निर्णय घेतला आहे.

सध्या महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील गणवेषधारी अधिकारी/ कर्मचारी यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्र.प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ३ मार्च २०१० अन्वये शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना असलेल्या प्रवास भत्ता व दैनिक भत्याच्या दरात दिलेल्या शासन निर्णयानुसार शहरानुसार दैनिक भत्ता दिला जात आहे.

परंतु, महाराष्ट्र पोलीस दलातील पोलीस शिपाई ते पोलीस निरीक्षक या पदापर्यंतचे पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना साप्ताहिक सुट्टीच्या मोबदल्यात त्यांना एका दिवसाचे वेतन (मूळ वेतन, अधिक भत्ते) दैनिक भत्ता म्हणून देण्यात येत आहे. त्याच धर्तीवर महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील

कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या पदापर्यंतच्या अधिकारी/कर्मचारी यांना देय असलेले एका दिवसाचे वेतन (मूळ वेतन,अधिक भत्ते) साप्ताहिक सुट्टीच्या मोबदल्यात सध्या देण्यात येणा-या दैनिक भत्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या पदापर्यंतचे अधिकारी/कर्मचारी यांना साप्ताहिक सुट्टीच्या मोबदल्यात त्यांना देय असलेल्या दैनिक भत्याच्या दरात वाढ करण्यात येत असून,सदर अधिकारी/कर्मचारी यांना देय असलेले एका दिवसाचे वेतन (मुळ वेतन,अधिक भत्ते) दैनिक भत्ते म्हणून देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे. सदर एका दिवसाचे वेतन दैनिक भत्ता म्हणून देण्यास साप्ताहिक सुटटीची कमाल मर्यादा एका कॅलेंडर वर्षात ८ दिवस इतकी असेल.

२. सदरचा दैनिक भत्ता ज्या अधिकारी/कर्मचारी यांनी साप्ताहिक सुटटीच्या दिवशी कर्तव्य बजाविलेले आहे त्यांनाच देण्यात यावा. त्यासाठी कार्यालयात/कारागृहात नोंदवही ठेवण्यात यावी व त्यामध्ये ज्या कामासाठी अधिकारी/कर्मचारी सुट्टीच्या दिवशी कर्तव्यावर आले होते, त्याची नोंद घेण्यात यावी. ही नोंदवही आवश्यक तेव्हा तपासणीसाठी उपलब्ध करुन देण्यात यावी. हा दैनिक भत्ता सरसकट दिला जाणार नाही, याची जबाबदारी यथास्थित संबंधित कार्यालय प्रमुखांची राहील.

३. याकरीता येणारा खर्च मागणी क्रमांक बी-५,मुख्यलेखाशिर्ष-२०५६ तुरुंग या मुख्यलेखाशिर्षाखाली (०१) (००) १०१ तुरुंग (००)(००)(०१) मध्यवर्ती तुरुंग (२०५६००३५) व (२) मागणी क्रमांक बी-५, मुख्यलेखाशिर्ष-२०५६,(००)(१०१) तुरुंग,(००)(०२)जिल्हा तुरुंग, (२०५६००४४) दत्तमत (१८) सुटटीच्या दिवसाची भरपाई या उदिष्टाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो चालु आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर आदेश दि.०१.१२.२०१६ रोजी पासुन लागू राहील.

५. सदर शासन निर्णय मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार गठीत करण्यात आलेल्या सक्षम समितीने घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०११४२३२५११२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manohar Bandpatte

Digitally signed by Manohar Bandpatte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=bb7b9a28cd6d8e2b1fa8f60d210258464e6ece204d02617fbb7ed6be3db6752c, cn=Manohar Bandpatte
Date: 2016.12.01 16:51:03 +05'30'

( म. रा. बंदपट्टे )
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (गृह- शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव, (अ.व.सु), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

९) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे-१
१०) कारागृह उपमहानिरीक्षक,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद
११) अधीक्षक,मध्यवर्ती कारागृह (सर्व)
१२) प्राचार्य,दौलतराव जाधव तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय,पुणे.६
१३) अधीक्षक,जिल्हा कारागृह (सर्व)
१४) अधीक्षक,खुले जिल्हा कारागृह (सर्व)
१५) प्राचार्य,किशोर सुधारालय,नाशिक
१६) अधीक्षक,रत्नागिरी विशेष कारागृह,रत्नागिरी.
१७) संपर्क अधिकारी,स्वतंत्रपूर खूली वसाहत,आटपाडी जि.सांगली
१८) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
१९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२२) उपकोषागार अधिकारी (सर्व)
२३) गृह विभाग,बीयुडी-१,मंत्रालय,मुंबई-३२
२४) निवडनस्ती-तुरुंग-१